महाराष्ट्र गोसेवा आयोग आस्थापनेवरील पदांना मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक- पविआ-२०२३/प्र.क्र.१०८/पदु-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यात महाराष्ट्र गोसेवा आयोग अधिनियम, २०२३ लागू करण्यात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ०३ अन्वये दि. ७.७.२०२३ च्या अधिसुचनेन्वये गोसेवा आयोग गठित करण्यात आला आहे. प्रस्तुत कायद्याच्या कलम १० नुसार गोसेवा आयोगाला त्याची कार्ये पार पाडण्यासाठी आवश्यकते अधिकारी व कर्मचारी शासनाने पुरविण्याची तरतूद आहे. त्यानुसार आवश्यक ती पद निर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

गोसेवा आयोगाचे कामकाज चालविण्यासाठी खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या ८ नियमित व ८ बाह्यस्त्रोताव्दारे घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा असे एकूण १६ पदे निर्माण करण्यास दिनांक ५.२.२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत प्राप्त झालेली मान्यता तसेच शासन कार्यनियमावलीमधील नियम२९- अन्वये मा. मुख्यमंत्री यांची प्राप्त झालेली मान्यता विचारात घेऊन खालीलप्रमाणे ८ नियमित पदे व ८ बाह्यस्त्रोताव्दारे घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा असे एकूण १६ पदांच्या निर्मितीस शासन मान्यता देण्यात येत आहे.:-

| क्र. | पदनाम व वेतनश्रेणी खर्च | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| **नियमित पदे** | | | |
| १. | सहआयुक्त पशुसंवर्धन | १ | एस-२५ (७८८००-२०९२००) |
| २. | पशुधन विकास अधिकरी गट- अ | २ | एस-२०(५६१००-१७७५००) |
| ३. | स्वीय सहाय्यक | १ | एस-१६(४४९००-१४२४००) |
| .४ | लेखाधिकारी | १ | एस-१६(४४९००-१४२४००) |
| ५. | प्रशासन अधिकारी गट - ब | १ | एस-१५ (४१८००-१३२३००) |
| ६. | वरिष्ठ सहाय्यक | १ | एस-१३ (३५४००-११२४००) |
| ७. | कनिष्ठ लिपिक | १ | एस-६ (१९९००-६३२००) |
| | एकूण पदे | ८ | |
| **बाह्यस्त्रोताव्दारे घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा** | | | |
| १. | कनिष्ठ लिपिक | १ | बाह्यस्त्रोत |
| २. | डाटा इंट्री ऑपरेटर | २ | बाह्यस्त्रोत |
| ३. | स्वच्छक | १ | बाह्यस्त्रोत |
| ४. | परिचर | २ | बाह्यस्त्रोत |
| ५. | सुरक्षा रक्षक | २ | बाह्यस्त्रोत |
| | एकूण मनुष्यबळ | ८ | |

३. सदर पदे भरण्यासाठी आयुक्त पशुसंवर्धन यांनी कार्यवाही करावी.

४. सदर पदांच्या वेतनाकरीता येणारा खर्च खालील लेखाशिर्षामधील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा-:.

लेखाशिर्ष :-

मागणी क्र. डी-४,
२४०३ - **पशुसंवर्धन,**
१०२ पशु व महिष विकास,
(१०) गोशाळा व पांजरपोळ विकास,
(१०)(०५)-महाराष्ट्र गोसेवा आयोग,
(१०० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम),
संगणक सांकेतांक २४०३ ई ४९६,
३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर)
३६-सहायक अनुदाने (वेतन)

५. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ०७/का.१४३१, दि. ०९.०१.२०२४, तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २१/२०२४/व्यय-२, दि. १७.०१.२०२४ व ९३/आ.पु.क., दि. २७.०२.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३०६११४७५६२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.03.06 11:56:50 +05'30'

**(नि.भा. मराळे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
४. मा. उप मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
५. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
६. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. अध्यक्ष, महाराष्ट्र गोसेवा आयोग, पुणे.
८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त.
१०. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) /(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
११. निवड नस्ती-पदु-३